सन २०२२-२३ या कालावधीसाठी विभागास दिलेली KRA उद्दीष्टये.

**महाराष्ट्र शासन**

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांकः KRA-२०२२/प्र.क्र.२२/२२/समन्वय**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय, मुंबई -४०० ०३२

दिनांक: २३ मे, २०२२.

**परिपत्रक:-**

शालेय शिक्षण व क्रीडा विभागासाठी सन २०२२-२३ या कालावधीसाठी खालील प्रमाणे Key Result Area (KRA) उद्दिष्टे निश्चित करण्यात आली असुन राज्याला राष्ट्रीय पातळीवर शैक्षणिक गुणवत्तेत वाढ करणे व दहावी पर्यंत मुलींच्या गळतीचे प्रमाण खाली आणणे, विद्यार्थ्यांना आधुनिक शैक्षणिक सुविधा उपलब्ध करुन देणे, विद्यार्थ्यांची आधार जोडणी करणे तसेच शिक्षकांना ऑनलाईन प्रशिक्षण देणे त्याचप्रमाणे राज्यात सर्वोत्तम खेळाडू तयार करण्यासाठी सुविधा निर्माण करणे इत्यादी प्रमुख उद्दिष्टे आहेत. ही उद्दिष्टे साध्य करण्याकरिता राज्यासाठी प्रगत शैक्षणिक महाराष्ट्र हा कार्यक्रम आखण्यात आला असून त्यानुसार प्राथमिक स्तरासाठी दि.२२ जून, २०१५ व माध्यमिक स्तरासाठी दि.१६ सप्टेंबर, २०१६ रोजी शासन निर्णय निर्गमित करण्यात आले आहेत. तसेच खेळाडू साठी क्रीडा विज्ञान केंद्र, बालेवाडी, पुणे व महाराष्ट्र आंतरराष्ट्रीय क्रीडा विद्यापीठ पुणे या सारख्या संस्था विकसित करण्यात येत आहेत. या विभागाच्या KRA अनुसार दिलेल्या उद्दिष्टांची पूर्तता करण्याच्या अनुषंगाने सर्व क्षेत्रीय अधिकाऱ्यांनी नियोजनबध्द व काटेकारपणे अंमलबजावणी करण्याची आवश्यकता आहे.

१. प्राथमिक स्तरावरील विद्यार्थ्यांच्या शैक्षणिक गुणवत्तेत (Learning Outcomes) मध्ये १० टक्केने वाढ करणे.(एसडी-६)

२.School MIS प्रणालीचे विकसन करुन ते User Acceptance Testing (UAT) च्या टप्प्यापर्यंतचे काम पूर्ण करणे. (एसडी-१)

३. शासकीय, अनुदानित व आरटीई अंतर्गत २५ टक्के शुल्क प्रतीपुर्तीचा लाभ घेण्याऱ्या खाजगी शाळांमधील सर्व विद्यार्थ्यांची आधार जोडणी व वैधता पूर्ण करणे. (एसडी-१)

४. Command Control Center (CCC) कार्यान्वित करणे. (एसडी-६)

५. BISAG द्वारे १२ शैक्षणिक Channel सुरु करणे. (एसडी-६)

६. इयत्ता १ली ते इयत्ता १२वीचा e-content विकसित करणे. (एसडी-६)

७. शिक्षक-शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांचे ऑनलाईन वेतन प्रदानासाठी CMP प्रणाली लागू करणे. (टीएनटी-३)

८. वरिष्ठ वेतन श्रेणी व निवड श्रेणी च्या शिक्षकांना ऑनलाईन प्रशिक्षण देण्यासाठी Learning Management System विकसित करुन जवळपास ९४००० शिक्षकांना प्रशिक्षण देणे. (प्रशिक्षण)

९. Performance Grading Index (PGI) मध्ये ५० गुणांनी वाढ करणे. (एसडी-६)

१०. महाराष्ट्र आंतरराष्ट्रीय क्रीडा विद्यापीठ, पुणे येथे सुरु करणे.(क्रीडा-१)

११. भविष्यातील सर्वोत्तम खेळाडूंसाठी/athlets घडविणे आणि त्यांच्या कामगिरीत वाढ करण्यासाठी भारतातील सर्वोत्कृष्ट क्रीडा विज्ञान केंद्र बालेवाडी, पुणे येथे विकसित करणे. (क्रीडा-१)

१२.समग्र शिक्षा अंतर्गत मंजूर आराखड्यानुसार निधीचा विनियोग करणे. (एसडी-१)

१३. स्टार्स प्रकल्पांतर्गत मंजूर आराखड्यानुसार निधीचा विनियोग करणे. (एसडी-६)

१४.मध्यान्ह भोजन अंतर्गत मंजूर आराखड्यानुसार निधीचा विनियोग करणे. (एसडी-३)

१५.विभागाचा व अखत्यारीतील कार्यालयांचा आकृतिबंध मंजूर करणे. (प्रशा-५)

१६. विभागाचा व अखत्यारीतील कार्यालयांचा वाहन आढावा घेणे . (प्रशा-५)

वरील KRA उद्दिष्टांची पूर्तता करण्याच्या अनुषंगाने सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक व सर्व शिक्षणाधिकारी (प्राथमिक व माध्यमिक) यांना या परिपत्रकाद्वारे सूचना देण्यात येत आहेत की, प्रगत शैक्षणिक महाराष्ट्र प्राथमिक व माध्यमिक स्तरावरील शैक्षणिक गुणवत्ता वाढविण्याच्या अनुषंगाने योग्य ती नियोजनबध्द कार्यवाही करावी. तसेच याबाबतचा मासिक प्रगती अहवाल नियमितपणे आयुक्त (शिक्षण) यांना सादर करावा. आयुक्त, शिक्षण व आयुक्त, क्रीडा यांनी उपरोक्त उद्दिष्टांच्या अनुषंगाने जिल्हानिहाय आढावा वेळोवेळी घेऊन शासनास अहवाल सादर करावा. तसेच प्राप्त अहवाला नुसार सर्व संबंधित कार्यासनानी पुर्ततेबाबतचा मासिक अहवाल शासनाच्या KRA प्रणालीवर अद्ययावत करण्याची कार्यवाही करावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनांच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२२०५२३१६०२२३८६२१ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by TIKARAM WAMAN KARPATE
Date: 2022.05.23 16:04:10 +05'30'

**( टि.वा.करपते )**

**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
२. मा.अपर मुख्य सचिव, मा.मुख्यमंत्री सचिवालय, मुंबई.
३. मा.मंत्री, शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे विशेष कार्य अधिकारी.
४. मा.राज्यमंत्री, शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे विशेष कार्य अधिकारी.

५. मा.मंत्री, क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे विशेष कार्य अधिकारी.
६. मा.राज्यमंत्री, क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे विशेष कार्य अधिकारी.
७. मा.सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
९. आयुक्त (क्रीडा), महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०.राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र राज्य प्राथमिक शिक्षण परिषद, चर्नी रोड, मुंबई.
११.सर्व सह सचिव/ उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२.शिक्षण संचालक, माध्यमिक व उच्च माध्यमिक, शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१३.शिक्षण संचालक, (प्राथमिक/माध्यमिक/अल्पसंख्याक व प्रौढ शिक्षण), शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१४.संचालक, महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, पुणे
१५.अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य माध्य. व उच्च माध्य. शिक्षण मंडळ, पुणे.
१६.अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य परीक्षा परिषद, पुणे.
१७.सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
१८. सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक,
१९.सर्व शिक्षणाधिकारी (प्राथमिक/माध्यमिक), सर्व शिक्षण निरिक्षक, मुंबई
प्रत,निवडनस्ती (समन्वय)